**महाराष्ट्र शासन**

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२०/प्र.क्र. ८४/ ना.पु.१५.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई -४०००३२.

दिनांक : २० ऑक्टोंबर, २०२०.

<u>वाचा:</u>- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२) विभागाचा शासन आदेश क्र. आस्थाप्र-२२१९/प्र.क्र.२४२/ना.पु.१५,दि.२०.०९.२०१९.

३) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र, दि.१९.०३.२०२०.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/कार्या.१२, दि.७.०७.२०२० व दि. २३.०७.२०२०.

५) श्री. भागडे यांच्या बदलीबाबतचा विभागाचा समक्रमांकाचा शासन आदेश, दि.१०.०८.२०२०.

६) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांचा निर्णय, दि.१६.१०.२०२०.

**<u>प्रस्तावना :</u>**

संदर्भाधीन शासन आदेश क्र.२ अन्वये श्री. नरेंद्र मधुकर भागडे यांची जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली येथे बदली करण्यात आलेली होती.

२. संदर्भाधीन पत्र क्र.३ मधील तक्रारीनुसार श्री. नरेंद्र मधुकर भागडे यांची जिल्हा पुरवठा अधिकारी, बीड येथे संदर्भाधीन शासन आदेश क्र.५ अन्वये मध्यावधी बदली करण्यात आलेली होती.

३. सदर बदली आदेशाविरुद्ध श्री. भागडे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.४५७/२०२० च्या अनुषंगाने संदर्भाधीन पत्र क्र.६ अन्वये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी संदर्भाधीन शासन आदेश क्र.५ पूर्वीची जैसे थे स्थिती कायम ठेवण्याचे आदेशित केलेले आहे.

**<u>शासन आदेश</u>**

श्री. नरेंद्र मधुकर भागडे, जिल्हा पुरवठा अधिकारी यांची जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली या पदावर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांच्याकडे पुढे होणाऱ्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून संदर्भाधीन शासन आदेश क्र.५ पूर्वीची स्थिती तात्पुरत्या स्वरुपात जैसे थे ठेवण्यात येत आहे .

२. त्यानुसार श्री. भागडे यांची जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली या पदावर तात्पुरत्या स्वरुपात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांच्या आदेशास अधीन राहून पदस्थापना देण्यात येत आहे.

३. तथापि, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर यांच्या पुढे होणाऱ्या सुनावणीच्या अनुषंगाने श्री. भागडे यांच्या बदलीस संदर्भाधीन पत्र क्र. ६ मधील आदेशानुसार दिलेली जैसे थे स्थिती उठविल्यास श्री. भागडे यांच्या बदलीचा संदर्भाधीन शासन आदेश क्र. ५ ताबडतोब अंमलात येईल व त्याद्वारे हा शासन आदेश रद्द समजण्यात येईल.

४. श्री. राजेंद्र रामभाऊ मिस्किन, जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२०१६३७०४४८०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Asmita Ravindra Patil

Digitally signed by Asmita Ravindra Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3aae158692ef65b4486d9f1ec9f35e5a368c85b29b6c959f9fc2c7c0e59d944c, serialNumber=8e2cf7f99a7e33f6152bff0b34255dd63550b37c8fbbb9a98cee4ecd4336f598, cn=Asmita Ravindra Patil
Date: 2020.10.20 16:39:17 +05'30'

(अस्मिता पाटील)
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) श्री. नरेंद्र मधुकर भागडे, जिल्हा पुरवठा अधिकारी.
२) श्री. राजेंद्र रामभाऊ मिस्किन, जिल्हा पुरवठा अधिकारी.

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नागपूर / औरंगाबाद.
२) उपायुक्त (पुरवठा), नागपूर/ औरंगाबाद.
३) महालेखापाल-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई / नागपूर.
४) जिल्हाधिकारी, गडचिरोली / बीड.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली .
६) खाजगी सचिव, मा. मंत्री ( अनापु व ग्रासं ) यांचे कार्यालय.
७) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( अनापु व ग्रासं ) यांचे कार्यालय.
८) सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक.
९) निवडनस्ती/नापु-१५.